रस्ता सुरक्षाविषयक राज्यस्तरीय कामकाज हाताळण्यासाठी शीर्ष संस्थेची स्थापना व त्यासाठी पदनिर्मितीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एमव्हिडी ०११७/प्र.क्र.१४/परि-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुख्य इमारत, मुंबई-३२
तारीख: २९ डिसेंबर, २०१८

**वाचा -**

१) मा. सर्वोच्च न्यायालय रस्ता सुरक्षा समितीचे पत्र क्र. क्र.१६/२०१६/सीओआरएस, दि.२४.११.२०१६
२) मा. सर्वोच्च न्यायालय रस्ता सुरक्षा समितीचे पत्र क्र. क्र.४६/सीओआरएस/२०१४-व्हॉल्यूम II, दि.२६.०५.२०१७
३) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल रिट याचिका (सिव्हील) क्र. २९५/२०१२ बाबत दि.३०.११.२०१७ रोजीचे आदेश.
४) परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. पआका/का-४/न.क्र.१९१/२०१७/जा.क्र.१७५३८, दि. २९.१२.२०१७
५) परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. पआका/का-४/र.सु.नि./२०१८/जा.क्र.४४५४, दि.१६.०३.२०१८
६) मंत्रिमंडळ सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, सामान्य प्रशासन विभाग यांचे दि.२७.१२.२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना -**

मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल रिट याचिका (सिव्हील) क्र. २९५/२०१२ मध्ये मा. न्यायालयाने दि.३०.११.२०१७ रोजी आदेश पारित केले असून त्या आदेशाची सर्व राज्यांनी अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. सदर आदेशातील मुद्दा क्र. १७(अ) नुसार सर्व राज्यांना दि. ३१.०१.२०१८ पूर्वी रस्ता सुरक्षा विषयक काजकाज हाताळण्यासाठी शीर्ष संस्था स्थापन करण्याचे निर्देश मा. न्यायालयाने दिले आहेत. त्याअनुषंगाने राज्यात रस्ताविषयक राज्यस्तरीय कामकाज हाताळण्यासाठी स्थापन करण्यात येणा-या शिर्ष संस्थेकरीता पदनिर्मीतीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन आहे.

सदर शीर्ष संस्थेकरीता पदनिर्मिती करण्याच्या प्रस्तावास उपसमितीच्या दि. ३०.०८.२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. उक्त प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीने तसेच त्यानंतर मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे.

## शासन निर्णय-

मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल रिट याचिका (सिव्हील) क्र. २९५/२०१२ मध्ये मा. न्यायालयाने दि.३०.११.२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार राज्यात रस्ताविषयक राज्यस्तरीय कामकाज हाताळण्यासाठी स्थापन करण्यात येणाऱ्या शिर्ष संस्थेकरीता खालीलप्रमाणे नविन पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नाव | पद संख्या | वेतनश्रेणी | पदाचा प्रकार | पदभरतीचा मार्ग |
|---|---|---|---|---|---|
| १. | सह परिवहन आयुक्त | १ | रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ७६०० | नियमित पद | प्रतिनियुक्तीने. |
| २. | परिवहन उप आयुक्त | १ | रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ६९००/- | | |
| ३. | उप अधिक्षक/ सहायक पोलीस आयुक्त | १ | रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००/- | | |
| ४. | कार्यकारी अभियंता (सा.बां. विभाग) | १ | रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ६६००/- | | |
| ५. | जनसंपर्क अधिकारी | १ | रु.९३००-३४८०० ग्रेड पे ४६००/- | | |
| ६. | रस्ता सुरक्षा सुपरवायजर | ५ | रु. ५००००/- प्रति माह या दराने | काल्पनिक पद | बाह्ययंत्रणेद्वारे. |
| ७. | वरिष्ठ लिपिक/ अधिक्षक | १ | रु. ३००००/- प्रति माह या दराने | | |
| ८. | कनिष्ठ लिपिक / टंकलेखक | ४ | रु. २००००/- प्रति माह या दराने | | |
| ९. | शिपाई | १ | रु. १००००/- प्रति माह या दराने | | |

२. प्रस्तुत पदांचा खर्च " मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनावरील कर, (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त, (०१) (०९) रस्ता सुरक्षा निधी (२०४१ ०५६४) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल. मात्र नवनिर्मीत पदांचा खर्च रस्ता सुरक्षा फंडातून भागविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२९१६२७२५४९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.12.29 16:36:44 +05'30'

**(द.ह.कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा)-१/२, मुंबई/नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८. सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी.
९. सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी
१०.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
११.वित्त विभाग (व्यय-८/वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती-परि-४

**प्रत माहितीस्तवः-**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
३. अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
५. प्रधान सचिव (परिवहन), यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
६. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.